**जिल्हा मध्यवर्ती फळरोपवाटिका, पंढरपूर जि. सोलापूर येथील प्रक्षेत्रावर संरक्षण भिंतीचे बाधकाम करणेसाठीच्या अंदाजपत्रकीय रक्कम रू. ४७,७५,५२८ लाख प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- फरोवा-२०१८/प्र.क्र.२३७/१३-अे,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :-१८ फेब्रुवारी, २०१९

**संदर्भ** :-१) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/फलो-२/नर्सरी/प्रशा.मा./१०८/१९ दि.०५/०२/२०१९.

**प्रस्तावना:-**

जिल्हा मध्यवर्ती फळरोपवाटिका, पंढरपूर जि. सोलापूर येथील प्रक्षेत्रावर गौणबाधकाम या बाबीखालील रोपवटिकेवर संरक्षण भिंतीचे बाधकाम करणेसाठीच्या अंदाजपत्रकीय रक्कमेस रू. ४७,७५,५२८लाख (अक्षरी रु. सत्तेचाळीस लाख पंच्याहत्तर हजार पाचशे अठ्ठावीस फक्त) यास कार्यकारी अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग,पंढरपूर, यांनी तांत्रीक मंजूरी दिलेली असून संचालक फलोत्पादन यांनी वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक- विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ विनियमन भाग-२ दि. १७ एप्रिल,२०१५ चे परिशिष्ट वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग ५ मधील अ.क्र.३ अन्वये विभाग प्रमुख/ प्रादेशिक कार्यालय प्रमुख यांना रु.२०.०० लाख पर्यतच्या किरकोळ नागरी बांधकामांना प्रशासकीय मान्यता देण्याचे वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आले आहे. प्रस्तुत प्रस्ताव विभाग प्रमुखांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकार मर्यादेबाहेरील असल्याने प्रशासकीय मंजूरीस्तव कृषि आयुक्तालयाने (संचालक, फलोत्पादन) सादर केला आहे. त्यानुसार जिल्हा मध्यवर्ती फळरोपवाटिका, पंढरपूर जि. सोलापूर येथील रोपवटिकेवर संरक्षण भिंतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

जिल्हा मध्यवर्ती फळरोपवाटिका, पंढरपूर जि. सोलापूर येथील प्रक्षेत्रावर रोपवटिकेवर संरक्षण भिंतीचे बाधकाम करणेसाठीच्या अंदाजपत्रकीय रक्कमेस रू. ४७,७५,५२८लाख (अक्षरी रु. सत्तेचाळीस लाख पंच्याहत्तर हजार पाचशे अठ्ठावीस फक्त) इतक्या रक्कमेस वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक- विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ विनियमन भाग-२ दि. १७ एप्रिल,२०१५ चे परिशिष्ट वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग ५ मधील अ.क्र.३ अन्वये तसेच नियोजन विभाग शासन परिपत्रक

क्र. ससमा-२०१०/प्र.क्र.४८(भाग-१)/का-१४६१,दि.११/६/२०१८. नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार जिल्हा मध्यवर्ती फळरोपवाटिका, पंढरपूर जि. सोलापूर येथील प्रक्षेत्रावर गौणबाधकाम या बाबीखालील रोपवटिकेवर संरक्षण भिंतीचे बाधकाम करणेसाठीच्या अंदाजपत्रकीय रक्कमेस रू. ४७,७५,५२८लाख ( अक्षरी रु. सत्तेचाळीस लाख पंच्याहत्तर हजार पाचशे अठ्ठावीस फक्त) अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१८१५२११७३९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Ashok Maroti Atram
Date: 2019.02.18 15:24:59 +05'30'

**(अशोक आत्राम)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे.
२. संचालक फलोत्पादन, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे,
३. विभागीय कृषी सहसंचालक,पुणे विभाग,पुणे.
४. जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, सोलापूर
५. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर,
६. महालेखापाल-१/२ , (लेखा परीक्षा) मुंबई /नागपूर,
७. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे.
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
९. सहसंचालक लेखा व कोषागारे,संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन,५ वा मजला,मुंबई -३२,
१०.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), कृषि व पदुम (कृषि व फलोत्पादन) विभाग, मंत्रालय,मुंबई.
११.निवड नस्ती (१३-अे)